**माझी वसुंधरा अभियानांतर्गत उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थांना रोख रकमेची बक्षिसे वितरीत करण्यासाठी आवश्यक निधी सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ यांना उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: अभियान २०२४/ प्र.क्र. ०८ / तां.क.१**

१५ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: ०६ मार्च, २०२४

**संदर्भ:**

१) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, क्रमांक अभियान-२०२०/ प्र.क्र.१३४/ तां.क.-१, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२०

२) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, क्रमांक अभियान-२०२१/प्र.क्र.५७/ तां.क.-१, दिनांक ८ जुलै, २०२१

३) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, क्रमांक मावआ-२०२१/ प्र.क्र.७५/ तां.क.-१, दिनांक २२ डिसेंबर, २०२१

४) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, क्रमांक अभियान २०२२/ प्र.क्र.१२०/ तां.क.-१, दिनांक ५ डिसेंबर, २०२२

५) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, क्रमांक माव-२०२२/ प्र.क्र.१०८/ तां.क.-१, दिनांक ७ नोव्हेंबर, २०२२

६) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, क्रमांक अभियान २०२३/ प्र.क्र.४६/ तां.क.१, दिनांक ५ जून, २०२३

७) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, क्रमांक मावअ २०२३/ प्र.क्र.८३/ तां.क.१, दिनांक २७ सप्टेंबर, २०२३

**प्रस्तावना:-**

पर्यावरणातील वातावरणीय बदलाचे महत्व लक्षात घेता, पर्यावरण विभागाचा **"पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग"** असा नामबदल करण्यात आला आहे. निसर्गाशी असलेली कटिबद्धता निश्चित करण्यासाठी पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या निसर्गाशी संबंधित पंचतत्वावर पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग कार्य करीत आहे.

२. पर्यावरणाचे जतन, संवर्धन व संरक्षण करण्यासाठी "माझी वसुंधरा (माय अर्थ)" हा अभिनव उपक्रम विभागाने हाती घेतला आहे. जो निसर्गाच्या "पंचमहाभूते" नावाच्या पाचही घटकांवर लक्ष केंद्रित करतो. त्यात भूमी (जमीन), जल (पाणी), वायू (हवा), अग्नी (ऊर्जा), आकाश (संवर्धन) यांचा समावेश आहे. या उपक्रमातून वातावरणीय बदल आणि पर्यावरणाच्या समस्यांबद्दल नागरिकांना जागरूक करून त्यांना पर्यावरणाच्या सुधारणेप्रती प्रयत्न करता येतील. त्यातून राज्याच्या शाश्वत विकासाप्रति प्रयत्न केले जातील.

३. **माझी वसुंधरा अभियान :**

३.१ पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या निसर्गाशी संबंधित पंचतत्त्वावर आधारित **"माझी वसुंधरा अभियान"** राज्यामध्ये दिनांक २ ऑक्टोबर, २०२० पासून राबविण्यात येत आहे. या अभियानांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व ग्राम पंचायती या स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन करणाऱ्या योजना प्रभावीपणे व मिशन मोड पध्दतीने राबविण्याची स्पर्धा घेण्यात येते.

३.२ निसर्गाच्या पंचतत्वावर आधारित पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन करणाऱ्या विविध शासकीय योजना/ कार्यक्रम/ उपाय एकत्रित करून त्या प्रभावीपणे व मिशन मोड पध्दतीने राबविण्यासाठी इंडिकेटीर स्वरूपात असलेली टुलकिट तयार करून दिली जाते. ज्यामध्ये त्यांनी केलेल्या कामाचे मुल्यमापन करण्यासाठी गुण ठेवलेले असतात. या टूलकिटनुसार विविध उपाययोजना स्थानिक संस्थांमध्ये एप्रिल ते मार्च या एक वर्षाच्या कालावधीत राबवावयाच्या आहेत.

३.३ स्थानिक संस्थांनी एप्रिल ते मार्च या कालावधीत केलेल्या कामाची माहिती एम.आय.एस. स्वरूपात माझी वसुंधरा अभियानाच्या वेब पोर्टलवर भरावयाची आहे. स्थानिक संस्थांनी भरलेल्या एम.आय.एस. चे त्रयस्त यंत्रणेमार्फत डेस्कटॉप मुल्यमापन करण्यात येते.

३.४ डेस्कटॉप मुल्यमापनात गुणानुक्रमे चांगली कामगिरी करणाऱ्या स्थानिक संस्थांचे मुल्यमापन त्रयस्त यंत्रणे मार्फत संबंधित स्थानिक संस्थेमध्ये प्रत्यक्ष भेट देवून करण्यात येत.

३.५ डेस्कटॉप असेसमेंट व फिल्ड असेसमेंट मधील प्राप्त होणाऱ्या गुणांच्या आधारे उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या स्थानिक संस्थांची विजेते म्हणून निवड करून या स्थानिक संस्थांचा सन्मान जागतीक पर्यावरण दिनी म्हणजे दिनांक ५ जून रोजी करण्यात येतो.

४. माझी वसुंधरा अभियानांतर्गत उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या स्थानिक संस्थांना रोख रकमांची बक्षिसे देण्यासाठी सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पात रू. १००.०० कोटीची तरतूद करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पीत निधी बक्षिसप्राप्त स्थानिक संस्थांना वितरीत करण्यासाठी सदस्य सचिव, महराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ यांना उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद बाबीचा विचार करून माझी वसुंधरा माझी वसुंधरा अभियानांतर्गत उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या स्थानिक संस्थांना रोख रकमेची बक्षिसे देण्यासाठी आवश्यक असलेला निधी रूपये १००,००,००,०००/- (रूपये शंभर कोटी फक्त) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,मुंबई यांना उपलब्ध करून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचा विनियोग माझी वसुंधरा अभियानांतर्गत स्थानिक संस्थांना रोख रकमेची बक्षिसे देण्यासाठी शासनाने विहित केलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब करून महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई यांनी करावा. तसेच, निधी विनियोगाबाबत उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

२. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्रमांक यु-४, ३४३५- परिस्थितीकी व पर्यावरण, ०४- प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३- वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, (०५)- माझी वसुंधरा, (०५) (०१) माझी वसुंधरा अभियान (३४३५ १३८३) या मुख्यलेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा. सदरचे अनुदान हे सर्शत आहे.

३. वरील अनुदानाबाबत सहसचिव (रोखशाखा), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय,मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर रक्कम आहरित करण्यासाठी कक्ष अधिकारी, रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय,मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई यांना धनादेशाव्दारे संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

४. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच त्यातील अटी शर्ती नुसार निर्गमित करण्यात येत आहे. प्रमाणित करण्यात येते की, सदर शासन निर्णय, दिनांक १२ एप्रिल,२०२३ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे.

(१) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागाला अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

(२) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,४,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

(३) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक सं.क्र.३१/का-१४७२, दि. १८.०१.२०२४ व वित्त विभागाच्या अनौस क्र. ३२/२०२२/व्यय-१६, दि. २०.०२.२०२४ अन्वये व त्या विभागांच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतंस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३०६१७५४१२७८०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल याचे नावाने व आदेशानुसार,

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.03.06 18:03:50 +05'30'

**( सु. कि. निकम)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२) मा. उप मुख्यमंत्री (गृह व उर्जा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

४) मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
६) अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, सायन, मुंबई-२२
७) सदस्य सचिव,महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,सायन, मुंबई-२२.
८) महालेखापाल महाराष्ट्र -१ मुंबई / २ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
९) संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, कोकण भवन, मुंबई
१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
११) सह संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, कोकण भवन, नाशिक, पुणे, अमरावती, छत्रपती संभाजी नगर व नागपूर
१२) वित्त विभाग (व्यय १६) , अर्थसंकल्प ०७ मंत्रालय, मुंबई
१३) नियोजन विभाग (का. १४७२ ) मंत्रालय, मुंबई
१४) निवडनस्ती (तां.क.१)